राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियान (NMAET) चे उप अभियान कृषि विस्तार (SAME) अंतर्गत राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणाकरिता सहाय्य (आत्मा) योजना सन २०१४-१५ मध्ये राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१४/प्र.क्र.२१०/३-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई-४०००३२

तारीख: ६ सप्टेंबर, २०१४

**वाचा - १. केंद्र शासनाचे पत्र क्र. मि.सं/F.NO.२७ (६)/२०१४-AE, दिनांक १५/७/२०१४**

**प्रस्तावना -**

१२ व्या पंचवार्षिक योजनेमध्ये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियान (NMAET) राबविण्यात येणार आहे. सदर अभियानाचे उप अभियान कृषि विस्तार अंतर्गत, कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) योजना राबविण्यात येणार आहे. सदर योजना सन २०१४-१५ मध्ये राबविण्यासाठी केंद्र शासनाने रु. ९८.४८३१ कोटी एवढया रक्कमेच्या कार्यक्रमास त्यांच्या संदर्भाधीन पत्रान्वये मान्यता कळविलेली आहे. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) सन २०१४-१५ मध्ये राज्यात राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियान (NMAET) चे उप अभियान कृषि विस्तार अंतर्गत, कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) योजना सन २०१४-१५ मध्ये राबविण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भाधीन पत्रान्वये मंजूर केलेल्या रु. ९८.४८३१ कोटी एवढया रक्कमेच्या कार्यक्रमास शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर कार्यक्रमाची अंमलबजावणी करताना केंद्र शासनाच्या संदर्भाधीन पत्रातील अटी/सुचना त्याचप्रमाणे सदर योजनेच्या केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. कार्यक्रमाची प्रत्यक्ष अंमलबजावणी निधी उपलब्धतेनुसार करण्यात यावी.

४. कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणाकरिता सहाय्य (आत्मा) कार्यक्रमाच्या उद्दिष्टपूर्तीसाठी संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या योजनेच्या मार्गदर्शक सुचना विचारात घेऊन उद्दिष्ट निहाय सविस्तर मार्गदर्शक सुचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांना

निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सुचना निर्गमित करतेवेळी पुढील प्रमुख बाबी अंतर्भूत करण्यात याव्यात.

I. लाभार्थी निवडताना अत्यल्प व अल्प भू-धारक शेतकऱ्यांना प्राधान्य देण्यात यावे. व अशा लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या लाभाबाबत स्वतंत्र नोंदी ठेवाव्यात.

II. अल्प व अत्यल्प भू-धारक शेतकरी, महिला शेतकरी व मागासवर्गीय शेतकऱ्यांना सदर कार्यक्रमांतर्गत प्राधान्य देण्यात यावे. असे लाभार्थी उपलब्ध न झाल्यास इतरांची निवड करण्यात यावी. महिला लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या लाभाची स्वतंत्र नोंद ठेवण्यात यावी.

III. या कार्यक्रमाचे मुल्यमापन त्रयस्थ संस्थेकडुन (Third Party Evaluation) करुन घ्यावे.

IV. सन २०१४-१५ मध्ये वैयक्तिक लाभ दिलेल्या लाभधारकांची यादी तालुका कार्यालये/पंचायत समिती/ जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी. तसेच ती यादी कृषि विभागाच्या वेबसाईटवर देखील देण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०६१३०१४६०५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Madan Umesh M

Digitally signed by Madan Umesh M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Madan Umesh M
Date: 2014.09.06 12:57:30 +05'30'

( उ.म.मदन )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त,(कृषि) कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
२. संचालक (आत्मा),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
३. सर्व मा. विधानमंडळ सदस्य.
४. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
५. सर्व प्रकल्प संचालक (आत्मा),
६. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
७. कृषि विकास अधिकारी, सर्व जिल्हा परिषद
८. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०. महालेखापाल १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
११. सर्व विभागीय आयुक्त
१२. सर्व जिल्हा अधिकारी
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी,सर्व जिल्हा परिषद
१४. वित्त विभाग (व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय),मंत्रालय,मुंबई.३२
१५. कार्यासन अधिकारी,२- अे,१५-अे,१६-अे,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
१६. निवड नस्ती का-३अे